**राज्यातील सर्व जिल्ह्यातील नदीजोड प्रकल्पाच्या धोरणाबाबत व जिल्हा वार्षिक योजनेत समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- २०१७/(१८७/२०१७) लपा**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १५ नोव्हेंबर, २०१८

<u>वाचा</u>:-१) नियोजन विभागाचे क्र.डिएपी-२०१६/प्र.क्र.१७५/१४८१-अ, दि.३०.०६.२०१७ व दि.११.०७.२०१७ रोजीची पत्रे.
२) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१८७/२०१७/लपा-१,दि.२३.०८.२०१७

**<u>प्रस्तावना :</u>**

जलसंपदा विभागांतर्गत यापूर्वी जळगांव/धुळे/नंदुरबार/सांगली इ. जिल्ह्यात नदी जोड योजनेतंर्गत जिल्हा स्तरीय कामे जिल्हा नियोजन मंडळाकडून प्रशासकीय मान्यता घेऊन व निधी उपलब्ध करुन करण्यात आली आहेत. सन २००५ मध्ये राबविण्यात आलेली "नदीजोड योजना" संपूर्ण राज्यात राबवावयाची असल्याने आवश्यक त्या स्तरावरील मंजूरी घेऊन तसा " धोरणात्मक निर्णय प्रशासकीय विभाग म्हणून जलसंपदा विभागाने घेणे आवश्यक असल्याचे नियोजन विभागाने कळविले होते व त्या अनुषंगाने उपरोक्त संदर्भात शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे." तथापि, जिल्हाधिकारी, औरंगाबाद, यांनी दि.१८.०४.२०१८ च्या पत्रान्वये जिल्ह्यांतर्गत नदीजोड योजनांबाबत जलसंपदा विभागाच्या दि.२३.०८.२०१७ च्या शासन निर्णयात नमूद केलेली पार्श्वभूमी जळगाव जिल्ह्याशी निगडीत असल्याचे नमूद करुन जळगाव जिल्ह्याकरीता शासन निर्णय मर्यादित असल्याचा निष्कर्ष काढलेला दिसतो. तथापि, संदर्भाधीन क्र.२ प्रमाणे शासन निर्णयात नमूद केलेली पार्श्वभूमी जळगाव जिल्ह्याशी सकृतदर्शनी निगडीत असल्याचे दिसत असले तरी त्यात विषद केलेले धोरण सर्व समावेशक असून ते राज्यातील सर्व जिल्ह्यातील नदी जोड प्रकल्पांना लागू करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

नियोजन विभागाच्या उपरोक्त पत्रातील अभिप्रायांच्या अनुषंगाने जिल्हास्तरीय नदी जोड योजनेचा जिल्हा वार्षिक योजनेत समावेश करण्याचे धोरण संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमित करुन या निर्णयाव्दारे सुनिश्चित करण्यात येत आहे.

जलसंपदा विभागाच्या अधिकाऱ्यांनी टंचाई सदृष्य परिस्थितीवर केलेली उपाय योजना मागील काळात अत्यंत लाभदायी ठरलेली आहे. अशा प्रकारच्या Intra-Sub basin नदी/ उपनदी जोड प्रकल्पाच्या योजनांसाठी संबंधित जिल्हाधिकारी व जलसंपदा विभागातील अधिकारी यांचेकडून समन्वय साधून पाणी उपलब्धतेचा सखोल अभ्यास करुन अतिरिक्त पाणी उपलब्धता झाल्यास अशा प्रकारचे नदी जोड प्रकल्प यशस्वीपणे राबवता येऊ शकतील. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय नदी जोड योजनांचा आवाका मोठा आहे व त्यासाठी येणारा खर्च देखील जास्त असतो. मात्र जिल्हास्तरावर पिण्याच्या पाण्याची उपलब्धता करणे, तुटीच्या किंवा अती तुटीचा खोरे/ उप खोऱ्यांना विपुल उपलब्धतेच्या खोरे/उप खोऱ्यांशी लहान जोडांव्दारे जोडणे त्वरीत लाभाच्या दृष्टीने आवश्यक वाटते. शासनाने या संदर्भात सूचना दिलेल्या आहेत. जिल्हा नियोजन मंडळाने सुध्दा काही ठिकाणी या योजना राबविल्या आहेत. मात्र या संदर्भात निश्चित धोरण नसल्याने बऱ्याच

ठिकाणी अडचणी निर्माण झाल्या आहेत. या अनुषंगाने सदर योजना जिल्हा नियोजन मंडळामार्फत राबविणेबाबत खालील प्रमाणे धोरण ठरविण्यात येत आहे.

१) नदी जोड योजना संकल्पित करतांना तुटीच्या किंवा अती तुटीच्या खोरे/ उप खोऱ्यांमधून पाणी वळविण्यात येऊ नये.

२) अतिरिक्त पाणी उपलब्ध असलेल्या एखाद्या पाणलोट क्षेत्रातून वाहणाऱ्या नदी /नाले/ कालवे यातील पाणी तुटीच्या / अति तुटीच्या पाणलोट क्षेत्रातील नदी /नाले/ कालवे / जलाशय यात वळवणेचा समावेश करता येईल. यात तुटीच्या खोऱ्यांतील जलाशय भरुन जलवर्धन करणे,त्यामुळे पिण्याचे पाण्याची उपलब्धता वाढवणे, सिंचन क्षेत्र पुर्नस्थापित करणे, कालव्यातून वहनाव्दारे पुनर्भरण करणे इ.बाबींचा समावेश राहील. या करिता पाणी उपलब्धता प्रमाणपत्र मुख्य अभियंता, जल विज्ञान प्रकल्प, नाशिक यांचेकडून प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

३) योजनेव्दारे पाणी वळविल्याने लाभ झालेले प्रभावाखाली आलेले क्षेत्र लाभव्यय गुणोत्तर परिगणित करण्यासाठी विचारात घ्यावे. योजनेचे लाभव्यय गुणोत्तर किमान १.५० इतके असावे.

४) सदर योजनांना प्रशासकीय मान्यता/सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभाग शासन निर्णय क्र. जिवायो/१००७/प्र.क्र.३९/ का-१४४४,दि. १६.०२.२००८ मधील सूचनांनुसार कार्यवाही करावी.

५) सदर योजनेअंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीसाठी नियोजन विभाग शासन निर्णय क्र. जिवायो/१००८/प्र.क्र.४१/का-१४४४, दि. १३ ऑगष्ट २००८ अन्वये स्वतंत्र उपशीर्ष उघडण्यात आले होते. सदर लेखा शिर्षांतर्गत जिल्हाधिकारी यांनी अपूर्ण कामांसाठी निधी उपलब्ध करावा.

६) प्रस्तुत योजना, त्यांच्या प्रकारानुसार जलसंपदा विभागाच्या अखत्यारितील म्हणजे, ज्या नदीतून पाणी ज्या धरणात/ साठवण तलावात वळविले जात आहे व तो ज्यांच्या ताब्यात असेल त्या यंत्रणेमार्फत किंवा जिल्हाधिकारी सुचवतील त्या यंत्रणेमार्फत राबविण्यात याव्यात.

७) योजनांच्या कामाचे गुण नियंत्रण जलसंपदा विभागातंर्गतच्या गुण नियंत्रण यंत्रणेमार्फत करण्यात यावे. तसेच तक्रारींचा निपटारा संबंधित दक्षता व गुण नियंत्रण पथकाकडून करावा. तसेच जिल्हाधिकारी किंवा शासन नियुक्त करेल अशा त्रयस्थ संस्थेकडून योजनेच्या कामाची पडताळणी करावी.

८) योजना पूर्ण झालेनंतर जलसंपदा विभागांतर्गत सिंचन व्यवस्थापन पाहणाऱ्या संबंधित पाटबंधारे विभागाकडे अशा योजना हस्तांतरित कराव्यात.

९) सदर योजना राबवितांना पुनर्भरणाव्दारे देखील लाभ होणे अपेक्षित असल्याने जोड कालव्यास अस्तरीकरण करु नये.

१०) नदीजोड योजनेसाठी लागणाऱ्या जमिनींच्या संपादनासाठी आवश्यक निधीची मूळ प्रशासकीय मान्यता प्राप्त अंदाजपत्रकात तरतूद नसल्यास अशा कामांसाठी सुधारित अंदाजपत्रक तयार करुन त्यात नवीन भूसंपादन अधिनियमानुसार तरतूद करण्यात यावी. नवीन कामांसाठी अंदाजपत्रक तयार करतांना नवीन भूसंपादन अधिनियमानुसार तरतूद करण्यात यावी.

११) नदीजोड योजनेचे काम प्रशासकीय मान्यता, तांत्रिक मान्यता, निधी उपलब्धता व आवश्यक भूसंपादन झाल्याशिवाय सुरु करु नये.

१२) नदी जोड कालव्याचे संकल्पन अधीक्षक अभियंता, कालवे संकल्पचित्र मंडळ, मध्यवर्ती संघटना, नाशिक यांचेकडून करुन घेणे अनिवार्य राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११५१६४७५७५०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Anand Wani

Digitally signed by Milind Anand Wani
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=811ef2c18db8728b01579fcb3071e86d7af3216659c06a8d34f3d2dda350efea, serialNumber=74547e206b216404acf50aef877b5d61e16ebdf315f88d58c513e53fab55ecf7, cn=Milind Anand Wani
Date: 2018.11.15 16:50:21 +05'30'

( मि.आ.वाणी )

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.सभापती/उपसभापती, विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेते, विधान परिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
६) मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७) सर्व सन्माननिय विधानसभा/विधानपरिषद व संसद सदस्य.
८) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
९) सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०) मा. मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१६) महासंचालक, संकल्पचित्र प्रशिक्षण, जल विज्ञान संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१७) सर्व विभागीय आयुक्त.
१८) सर्व कार्यकारी संचालक / मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९) आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व जिल्हाधिकारी.
२१) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२२) अर्थशाखा १/२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) विभागीय संपर्क अधिकारी माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२४) कार्यासन (लपा) संग्रहार्थ.

******